# जोनाथन लिव्हिंग्स्टन सीगल

रिचर्ड बाख



सकाळ झाली होती.समुद्राच्या फेसाळत्या लाटांवर सूर्यकिरणे चमचमत होती. किना-यापासून थोडया अंतरावर मच्छिमारीची एक बोट येऊन उभी राहिली. समुद्रपक्ष्यांचा एक थवा माशांच्या तुकडयांसाठी तिकडे धावला आणि आपापसात भांडू लागला.

या सगळया कोलाहलापासून दूर ..एकटाच, एक पक्षी उडण्याचा सराव करीत होता.शंभर फूट उंच जाऊन त्याने आपले दोन्ही पाय जुळविले,चोच वर केली आणि वा-याच्या वेगाने तो खाली झेपावला.त्याच्या डोळयात एक आगळे तेज झळकत होते. हवेत उडण्याच्या एका अवघड प्रकाराचा तो सराव करीत होता.परंतु एका छोटया चुकीमुळे त्याचे पंख थरथरू लागले. हवेतच त्याचा तोल गेला आणि एखादया निर्जीव दगडासारखा तो समुद्रात कोसळला. वास्तविक समद्रपक्षी असे कधी पडत नाहीत.उडता उडता अशा प्रकारे पडणे ही त्यांच्यासाठी लाजिरवाणी गोष्ट असते.

परंतु या पक्ष्यावर त्या पडण्याचा यत्किंचितही परिणाम झाला नाही.तो पंख फैलावून आकाशात उडण्याचा बारकाईने अभ्यास करत होता.तो कोणी सामान्य पक्षी नव्हता. तो होता ..**जोनाथन लिव्हिंग्स्टन सीगल.**

सर्वसामान्यतः समुद्रपक्ष्यांना उडणे फारसे माहिती नसते — किना-यावरून अन्न मिळवण्यासाठी जाणे आणि परत येणे.बस्. उडण्यात त्यांना फारसे स्वारस्य नसते.केवळ अन्न मिळविणे हाच त्यांच्या उडण्याचा हेतू असतो. परंतु या समुद्रपक्ष्याला नुसते खाण्यापिण्यात रूची नव्हती,त्याला उडणे सर्वात जास्त महत्त्वाचे वाटत होते. आणि याामुळेच इतर पक्षी आणि त्याचे आईवडिल देखील त्याच्यावर नाराज होते. समुद्राच्या लाटांना समांतर उंचीवर उडण्यात काय फायदा ? या वेळ घालविण्यातून काय साध्य होणार ?

“तू इतर समुद्रपक्ष्यांसारखा का वागत नाहीस जॉन ?” त्याची आई विचारत असे. “उडणे विडणे दुस-यांवर सोपव. तू नीट खात जा.प्रकृतीची काळजी घे. तू किती अशक्त झाला आहेस.”

त्याचे वडिल सांगत, “हे बघ जॉन, आता थंडी सुरू होईल. उथळ पाण्यातील मासे खोल पाण्यात जातील. तुला खरोखर काही शिकायचे असेल तर मासे पकडायला शिक. उडणे हा एक चांगला शौक आहे. पण त्यामुळे तू पोट भरू शकतोस का ? आपण अन्न मिळविण्यासाठीच उडतो हे विसरू नकोस.”

जोनाथनने मान डोलावली. त्यानंतर काही दिवस इतर समुद्रपक्ष्यांप्रमाणेच त्याने अन्नाच्या शोधात मच्छिमारीच्या नावा पालथ्या घातल्या. पण त्याच्या स्वभावाला ते मानवत नव्हते.

“माझ्याकडून असे साचेबंद काम होणार नाही. मी उडेन. मला अजून बरेच काही शिकायचे आहे”.
त्यानंतर थोडयाच वेळात जोनाथन एकटाच दूर समुद्रात उडायला लागला. तो उपाशी होता पण आनंदात होता.तो उडण्याच्या नवीन लकबी शिकत होता.तो आता इतर कोणत्याही समुद्रपक्ष्यापेक्षा वेगाने उडू शकत होता.



समुद्रसपाटीपासून हजार फूट उंचीवरून त्याने आपले पंख फडफडविले आणि खालच्या दिशेने सुरकांडी मारली . सहा सेकंदात तो सत्तर मैलाच्या वेगाने खाली येऊ लागला . या वेगाला तोल सांभाळणे हे अतिशय अवघड काम होते . त्याने वारंवार प्रयत्न केले होते . पण सत्तर मैलाच्या वेगाने वरच्या दिशेने उडायला लागताना त्याचा तोल जाऊन तो समुद्राच्या निळया लाटांवर आदळायचा . ओले पंख वाळविताना तो मनाशी विचार करीत असे — "मी काय करू ? वेगात असताना पंख अजिबात न हलविता प्रयत्न करू का ? त्यावेळी शरीर अचल अवस्थेत आणू का ?"

यानंतर त्याने दोन हजार फूट ऊंचीवरून सुरकांडी मारली . मागच्यावेळचे धडे त्याच्या चांगलेच लक्षात होते . यावेळी तो यशस्वी झाला . दहा सेकंदातच तो नव्वद मैलाच्या वेगाने उडायला लागला . त्यासाठी प्रचंड बळ लागले . . पण तो यशस्वी झाला होता . समुद्रपक्षी किती वेगाने उडू शकतात याचा त्याने विक्रम स्थापन केला होता . परंतु यश केवळ काही क्षणच टिकले . ज्याक्षणी त्याने पंखांचा कोन बदलला त्याचक्षणी तोल जाऊन तो समुद्रात जाऊन कोसळला .

रात्र झाली होती . गलितगात्र होऊन कसातरी पोहत तो किना-यावर आला . त्याचे शरीर ठणकत होते . . पंखांमध्ये ताकद नव्हती . पराभवाचे ओझे त्याला सहन होत नव्हते . "मी जर समुद्रात बुडून मेलो असतो तर बरे झाले असते" . तो मनाशी विचार करत होता . पाण्यात डुबकी मारताना आतील आवाज त्याला ऐकू आला . . "अखेरीस मी काय करू शकतो ? मी एक सामान्य समुद्रपक्षी आहे . मी माझ्या मर्यादांमध्ये अडकलो आहे . मी जर चांगले उडण्यासाठी जन्माला आलो असतो तर माझ्या बुद्धिची प्रत वेगळी असली असती . मी वेगाने उडण्यासाठी जन्माला आलो असतो तर माझे पंख छोटे असते व मी माश्यांऐवजी उंदीर खाल्ले असते . माझे वडिल योग्य तेच सांगत होते . . मला माझा हा उडण्याचा मूर्ख हट्ट सोडायला हवा . मला माझ्या थव्यात परत जाऊन मी जो काही आहे त्यात समाधान मानायला हवे . मी एक साधारण आणि मर्यादित कुवतीचा समुद्रपक्षी आहे ."

आता त्याने एक साधा समुद्रपक्षी म्हणून जगायचा निश्चय केला . त्याचे आई वडिल व थव्यातील इतर पक्षी सुद्धा या निर्णयावर खूष झाले असते . तो एका सामान्य समुद्रपक्ष्यासारखा उडत किना-याकडे निघाला . तो आता पंख फैलावणे, उंच उडणे हे सर्व सोडून देणार होता . आता कोणतेही आव्हान नव्हते म्हणूनच अपयशाची भीती सुद्धा नव्हती .

रात्र झाली होती आणि तो उडत होता . परत त्याला आतील आवाज ऐकू आला " समुद्रपक्षी कधीच रात्री उडत नाहीत . तसे असते तर त्यांचे डोळे घुबडासारखे मोठे असते आणि पंख पारव्यासारखे छोटे असते . त्यांना दिशेचे ज्ञान देणारे डोके असते" .

हवेत शंभर फूटांवर असताना जोनाथनचे डोळे चमकले . त्याचे दुखणे गायब झाले . " छोटे पंख . . पारव्यासारखे छोटे पंख . ."

हेच उत्तर आहे .
"मी पण किती मूर्ख आहे . उडण्यासाठी मला छोटे पंख हवेत . वेगाने उडताना मला बाहेरचे कल्ले मिटून घेऊन आतील छोटे पंख वापरून उडायला हवे . छोटे पंख !"



त्याने काळयाभोर समुद्रावरून दोन हजार फूट उंच उड्डाण केले.अपयश किंवा मृत्यचू भय आता त्याच्या मनात नव्हते. त्याने बाहेरील कल्ले मुडपले आणि आतील छोटया पंखांनी वाऱ्याच्या वेगाने तो उडू लागला. वेगाने त्याने खालच्या दिशेने सुरकांडी मारली. सत्त्तर मैल..नव्वद ..एकशे वीस आणि अजूनच जोरात..ताशी एकशे चाळीस मैल. या वेगामुळे देखील त्याच्या बाहेरील पंखांना काहीच त्रास होत नव्हता. पाण्याजवळ येऊन त्याने पंख हलविले आणि एक पलटी घेऊन तो परत चंद्राकडे झेपावला. त्याच्या हृदयात नवीन आशा पल्लवित झाल्या होत्या. तो खूप आनंदात होता. एकशे चाळीस मैलाचा वेग आणि सर्व गोष्टी त्याच्या कहयात..त्याचा स्वतःवरच विश्वास बसत नव्हता. दोनच्या ठिकाणी पाच हजार फूटांवरून उडताना काय वाटेल ? तो आश्र्चर्यचकित होत होता.

काही क्षणांपूर्वी त्याने केलेला निश्र्चय तो विसरून गेला. ती स्वतःला दिलेली वचने तोडण्यात त्याला काहीही दुःख होत नव्हते. असली वचने सामान्य समुद्रपक्ष्यांसाठी असतात. जो सर्वश्रेष्ठ आहे त्याचे असल्या वचनांशी काहीच देणेघेणे नव्हते.

अथक परिश्रम आणि अपार मेहनत घेऊन तो अजून चांगले उडण्याचे प्रयत्न करत राहिला.दुसऱ्याच दिवशी त्याचा वेग दोनशे चौदा मैल होता. या वेगाला छोटयाशा चुकीनेदेखील त्याच्या शरीराच्या चिंधडया झाल्या असत्या. पण वेगात ताकद होती..वेगात आनंद होता..वेगाने उडणे अलौकिक होते.

ताशी दोनशे चौदा मैल. समुद्रपक्ष्यांच्या जगात हा एक ऐतिहासिक क्षण होता.परंतु जोनाथन एकटाच पुढे जात राहिला.आता तो पटकन हवा तसा वळू शकत होता. थव्यातील इतर पक्ष्यांना आपल्या यशाची कहाणी सांगायला जाण्याऐवजी जोनाथन हवेत उडतानाच्या विविध करामतींचा सराव करत राहिला. हवेत गिरकी घेण्यासारख्या कियांचा तो बारकाईने अभ्यास करू लागला.

रात्री तो एकदम थकून आपल्या थव्यात पोहोचला.त्याला वाटले की इतर पक्षी त्याच्या साहसाची व त्याच्या प्रयत्नांची प्रशंसा करतील.आता आयुष्य जगण्याला कितीतरी कारणे होती.दिवसभर सडलेल्या माशांच्या तुकडयांसाठी भांडत राहण्यापेक्षा आयुष्याला प्रयोजन होते. आता समुद्रपक्षी अज्ञानाच्या अंधःकारातून बाहेर येऊन उडण्याचे ज्ञान मिळवू शकणार होते. विविध कौशल्ये आत्मसात करू शकणार होते. आता समुद्रपक्षी मुक्त होणार होते.ते सर्व उडू शकणार होते. समुद्रपक्ष्यांचे भविष्य आता उज्वल होते.

समुद्रपक्ष्यांनी एक सर्वसाधारण सभा आमंत्रित केली.ते सर्व जोनाथनची प्रतीक्षा करत होते.जोनाथनला सभेत सर्वांच्या मध्यभागी येण्यास सांगितले गेले. ही कोणत्याही समुद्रपक्ष्यासाठी अत्यंत शरमेची बाब होती. समुद्रपक्ष्यांच्या पंचायतीने आपला निर्णय सुनावला.

"जोनाथन लिव्हिंग्स्टन सीगल , तुला एक दिवस तुझ्या बेजबाबदारपणाची जाणीव होईल.तू जे काही केलेस ती एक मोठी चूक होती.आपल्याला या जगात चरितार्थासाठी अन्न मिळविणे व जास्तीत जास्त जिवंत राहणे यासाठी पाठविले गेले आहे. तेच आपल्या आयुष्याचे सार्थक आहे."

पंचांना आजवर कोणत्याही आरोपीने उत्तर दिले नव्हते. पण जोनाथन मोठयाने ओरडला.



“कोणता बेजबाबदारपणा ? तुम्ही हे काय म्हणता आहात ? माझ्याहून जास्त जबाबदार कोण असू शकतो.मी जीवनाचा खरा अर्थ शोधला आहे.हजारो वर्षे आपण सडलेल्या माशांच्या तुकडयांसाठी भांडत आलो आहोत.पण आता आपल्या आयुष्याला एक विशिष्ट उद्दिष्ट आहे.शिकणे..शोध घेणे.. मुक्त होणे.मला एक संधी दया.मी माझ्या शोधाबद्दल सांगतो”.

सभेत स्मशानशांतता पसरली.कोणीच बोलत नव्हते.सभा समाप्त झाली. सर्वांनी आपले कान बंद करून जोनाथनकडे पाठ फिरवली.जोनाथन आता एकटा राहू लागला. एकटे राहाण्यात त्याला विशेष दुःख नव्हते. दुःख असेल तर एवढेच होते की इतर पक्षी उडण्याचे महत्त्व समजू शकत नव्हते. जाणूनबुजून स्वतःचे डोळे बंद करून घेऊन ते आपले उज्वल भविष्य नाकारत होते.

तिकडे जोनाथन रोज नवीन काहीतरी शिकत होता.आता तो पाण्याच्या प्रवाहात दहा फूट खोल पोहणा-या माशांची सुद्धा शिकार करू शकत होता. मासेमारांनी फेकलेल्या अन्नाच्या तुकडयांवर आणि सडलेल्या माशांवर आता तो पोट भरण्यासाठी अवलंबून नव्हता. तो पंख पसरून आकाशात लांबवर फिरून येत असे.

त्याने फक्त स्वतःसाठी काहीतरी मिळविले होते. थव्यातील इतरांसाठी नाही. याचेच त्याला वाईट वाटत होते. उंच उडण्यासाठी त्याने जी किंमत मोजली होती त्याची त्याला पर्वा नव्हती. सामान्य पक्षी भीती, द्वेष, राग अशा भावनांनी भरलेले सुखासीन आयुष्य जगतात व लवकरच मरून जातात.

....................

एक दिवस जोनाथनने दोन समुद्रपक्ष्यांना आकाशात उडताना पाहिले. ते अत्यंत कौशल्याने आकाशात विहार करत होते.जोनाथनने त्यांची परीक्षा घेण्याचे ठरविले.त्याने आपल्या पंखांचा कोन थोडासा बदलला आणि तो जरा संथगतीने उडू लागला. त्या दोन समुद्रपक्ष्यांनी हुबेहूबपणे तशाच संथगतीने उडायला सुरूवात केली. जोनाथनने जेव्हा खालच्या दिशेने सुरकांडी मारली तेव्हा त्यांनी पण तसेच केले.

अखेरीस जोनाथनकडे पाहून त्या दोन समुद्रपक्ष्यांनी स्मितहास्य केले आणि ते म्हणाले
“आम्ही तुझ्या गटातील आहोत जोनाथन.आम्ही तुला आपल्या घरी न्यायला आलो आहोत. हे घर खूप उंच ठिकाणी आहे ”.

“मला थव्यातून काढून टाकले आहे आणि मला घर नाही”. जोनाथन म्हणाला.

“याहून जास्त उंचावरून उडणे मला अशक्य आहे”.



“नाही जोनाथन. .तुला जमेल.तू खूप काही शिकला आहेस.तुझ्या शिक्षणाचा एक अध्याय संपला आहे आणि पुढचा सुरू करण्याची वेळ आता आली आहे”.

जोनाथन त्या दोघांबरोबर उडाला आणि आकाशात दृष्टिआड झाला.

तो तर स्वर्गच होता.पृथ्वीवरून वरती उडताना त्याचा देह चमकत होता. येथे तो पृथ्वीपेक्षा दुप्पट गतीने उडू शकत होता. आता तो ताशी दोनशे पन्नास मैल वेगाने सहज उडत होता.स्वर्गात कशालाच मर्यादा नव्हती.

येथे एक डझनभर समुद्रपक्षी होते. तिथे त्याला आपण आपल्या घरात आहोत असेच वाटत होते. वाळूवर उतरण्यासाठी त्याला आपले पंख वाकवून गती कमी करावी लागली.इतरजण पंख न हलविता उतरले.त्यांचे स्वतःच्या शरीरावर विलक्षण नियंत्रण होते. जोनाथन थकून किना-यावरच झोपी गेला.येथे शिकण्यासारखे बरेच होते.पृथ्वी आणि या जागेत एकच फरक होता.
“येथील समुद्रपक्षी त्याच्यासारखाच विचार करत होते. त्या सर्वांना उडण्यात परमानंद मिळत होता. त्यांच्या आयुष्याचे उद्दिष्ट एकच होते - उडण्यात तरबेज होणे.ते सर्व कुशल समुद्रपक्षी होते आणि रोजच्या रोज ते तासनतास उंच उडण्याचा सराव करण्यात मग्न असत.”

स्वतःच्या काफिल्याला आता जोनाथन जवळजवळ विसरलाच होता.एक दिवस त्याने आपल्या एका सहका-याला विचारले “येथे इतके कमी समुद्रपक्षी कसे काय ? पृथ्वीवर तर हजारो समुद्रपक्षी होते”.

“हजारो , लाखो समुद्रपक्ष्यांमधून एखादाच येथे येऊन पोहोचतो. तू त्यांच्यातील एक आहेस जोनाथन.आम्ही सर्वजण किती हिंडून येथे पोहोचलो ते आमचे आम्हाला माहिती.पण तू एकाच फटक्यात इतके शिकलास की तुला आमच्यासारखे येथे पोहोचण्यासाठी जन्ममरणाचे हजारो फेरे पडले नाहीत.”

एक दिवस रात्रीच्या वेळी हिंमत करून जोनाथन प्रमुखाकडे गेला.त्याला नुकतेच कळले होते की प्रमुख आता लवकरच हे जग सोडून जाणार आहे.

“चांग”. .जोनाथनने जरासे घाबरून हाक मारली. त्या वृद्ध समुद्रपक्ष्याने आपल्या दयाळू नजरेने त्याच्याकडे पाहात विचारले, “बोल बाळा”.प्रमुख कोणत्याही समुद्रपक्ष्यापेक्षा जलद उडू शकत होता.त्याला उडण्यातील अनेक बारकावे माहिती होते. इतरांना अजून त्याच्याकडून शिकण्यासारखे बरेच शिल्लक होते.

“यानंतर काय होईल ? आम्ही सर्वजण कुठे जाणार ? स्वर्गासारखी कोणतीच दुसरी जागा नाही का ?”



“प्रत्यक्षात स्वर्ग नावाची कोणतीही जागा नाहीये जोनाथन. स्वर्ग म्हणजे कोणतीही जागा नाही आणि कोणतीही वेळ नाही. स्वर्गाचा अर्थ आहे परिपूर्ण होणं. चांग बोलता बोलता क्षणभर थांबला. . तू खूप जलद उडतोस ना ?”

“मला जलद उडायला खूप आवडतं” जोनाथन म्हणाला.

“ज्या क्षणी तू परिपूर्ण गतीने उडशील त्या क्षणी स्वर्गात असशील. आणि ही गती ताशी हजार . . करोड मैल नाही किंवा प्रकाशाच्या गतीइतकी पण नाही. कारण प्रत्येक संख्येला एक मर्यादा आहे. . आणि परिपूर्णतेला कोणतीच सीमा नाही. परिपूर्ण गती म्हणजे बस्. . त्या गतीने उडणं.”

कोणत्याही पूर्वसूचनेशिवाय चांग क्षणात तिथून लुप्त झाला आणि पाण्याजवळ पन्नास फूटांवर जाऊन उभा राहिला. क्षणभरातच तो तिथूनही दिसेनासा झाला आणि जोनाथनच्या खांदयापाशी दिसू लागला.

“यात फार मजा येते”. तो म्हणाला.

जोनाथन स्तब्ध झाला. स्वर्गाबद्दल विचारायचे विसरून गेला.

“तुम्ही हे कसे करता ? असे करताना नक्की काय वाटते ? यामुळे तुम्ही किती दूरपर्यंत जाऊ शकता ?”

“तुम्ही यामुळे हवे तेव्हा हवे तिथे जाऊ शकता”. वृद्ध पक्ष्याने सांगितले. “मी सर्व ठिकाणी फिरून आलो आहे. सर्वा त आश्चर्यकारक गोष्ट अशी आहे की जे प्रवासाच्या मोहाने पूर्णत्वाला नाकारतात ते कुठेच जाऊ शकत नाहीत. आणि जे परिपूर्णतेसाठी झगडतात ते सर्व ठिकाणी जाऊन येतात.”

“तुम्ही मला असे उडणे शिकवाल का ?” जोनाथनने विचारले. त्याला आता या अपरिचित रस्त्यावर चालणे भीतीदायक वाटत होते.

“वाटल्यास तू आत्ता लगेच शिकणे सुरू करू शकतोस”. चांग म्हणाला.

चांग धीम्या गतीने बोलत होता व आपल्या शिष्याकडे अभिमानाने पाहात होता.

“जर तुला विचारांच्या गतीने उडायचे असेल तर हे मनात आधी ठसव की तू तिथे पोहोचला आहेस.”

चांगच्या म्हणण्याचा अर्थ असा होता की, जोनाथन , तू स्वतःला तुझे बेचाळीस इंच पंख असलेले शरीर समजू नकोस. तुझे अस्तित्व स्थलकालाच्या बंधनातून मुक्त आहे.



जोनाथन दिवसरात्र अक्षरशः तप करू लागला. आणि एक दिवस किना-यावर डोळे मिटून उभा विचारांत हरविलेला असताना त्याला वाटले की त्याला चांगचे म्हणणे कळले आहे. "हे पूर्ण सत्य आहे. मी एक असीम. . मर्यादारहित असा समुद्रपक्षी आहे. मी परिपूर्ण आहे". तो आनंदाने बेभान झाला.

"शाबास पठ्ठे" चांग म्हणाला. त्याच्या आवाजात यशाची पावती होती.

जोनाथनने डोळे उघडले. तो त्या वृद्ध समुद्रपक्ष्याबरोबर कोणत्यातरी वेगळयाच किना-यावर उभा होता. तेथील हिरव्या आकाशात दोन सोनेरी सूर्य चमकत होते.

"शेवटी तुला माझे म्हणणे लक्षात आले". चांग म्हणू लागला. "पण तुला अजून अभ्यास करावा लागेल".

जोनाथनला ती जागा नवीन होती. "आपण कुठे आहोत ?". त्याने विचारले.

"आपण परग्रहावर आहोत. येथील आकाश हिरवे आहे आणि सूर्याप्रमाणे दोन तारे आहेत".
चांग शांतपणे उत्तरला. नवीन आसमंताचा त्याच्यावर अजिबात परिणाम झाला नव्हता.

पृथ्वी सोडल्यावर प्रथमच जोनाथन ओरडला. . "ही युक्ति खरोखर वापरात येते तर"

"ही युक्ति नेहमीच कामास येईल. फक्त तुम्हाला स्वतःला नक्की माहिती पाहिजे की तुम्ही कुठे जाणार आहात".

परतताना संध्याकाळ होऊन गेली होती. इतर समुद्रपक्षी जोनाथनकडे भयभीत नजरेने पाहात होते. त्यांनी नुकतेच त्याला डोळयादेखत अदृश्य होताना पाहिले होते.

समुद्रपक्ष्यांच्या अभिनंदनाच्या वर्षावात जोनाथन एक मिनिटापेक्षा जास्त रमू शकला नाही.
"मी येथे नवीन आहे. मला अजून तुमच्याकडून बरेच काही शिकायचे आहे."

"मला हे खरे वाटत नाही". सुलिवन नावाचा एक समुद्रपक्षी म्हणाला. "तू नवीन काहीही शिकायला घाबरत नाहीस. मी तुझ्यासारखा निर्भय समुद्रपक्षी दहा हजार वर्षात पाहिला नाही. आता तर तू सर्वात अवघड काम करायला तयार आहेस. तू दया आणि प्रेम याचा अर्थ शिकायला तयार आहेस."

बघताबघता एक महिना संपला आणि जोनाथनने आश्चर्यकारक वेगाने प्रगती केली. मुळातच तो नवीन गोष्टी पटापट शिकायचा पण वृद्ध समुद्रपक्ष्याचा खास शिष्य म्हणूनही त्याने नवीन गोष्टी लवकर आत्मसात केल्या. नंतर एक दिवस चांग नाहीसा झाला. जातानाचे त्याचे शेवटचे शब्द होते. . "जोनाथन. . नेहमी सगळयांवर प्रेम आणि दया कर.

जसजसे दिवस जाऊ लागले जोनाथनला पृथ्वीची आठवण व्याकूळ करू लागली. पृथ्वीवर



असताना त्याला आत्ताच्या ज्ञानाच्या एक शतांश किंवा एक हजारांश सुद्धा ज्ञान असते तर ते जीवन किती सुखाचे झाले असते. तो विचार करू लागला. कदाचित पृथ्वीवर असा कोणी समुद्रपक्षी असेल जो बंधनातून मुक्त होण्यासाठी धडपडत असेल. शिळया भाकरीचा तुकडा आणि सडलेले मासे यापेक्षा जास्त काही मिळविण्याच्या मागे असेल. त्याच्यासारख्या अनेक जणांना थव्यातील इतर पक्ष्यांनी खरे बोलण्यापासून परावृत्त केले असेल. या विषयावर तो जितका खोलवर विचार करू लागला तितके त्याचे मन पृथ्वीवर जाण्यासाठी ओढ घेऊ लागले.

जोनाथन वृत्तीने एक शिक्षक होता. आणि प्रत्येक समुद्रपक्ष्याला त्याने प्राप्त केलेल्या खरेपणातील आनंदाची झलक दाखविण्याची इच्छा बाळगून होता.

पृथ्वीवरील समुद्रपक्षी नवीन काही शिकायला तयार होतील की नाही याबद्दल सुलिवनच्या मनात शंका होती. तो म्हणाला,

"हे बघ जॉन. . इतर पक्षी तुझे म्हणणे ऐकतील हे तू कसे गृहीत धरलेस ? एक म्हण आहे . . *जो समुद्रपक्षी सर्वात पुढचे पाहू शकतो तोच सर्वात उंच उडू शकतो.* तू जिथून आला आहेस ते समुद्रपक्षी अजून जमिनीवरच आहेत. एकमेकांबरोबर भांडताहेत. ते स्वर्गापासून हजारो मैल खाली आहेत. ते जिथे उभे आहेत तिथून तू त्यांना स्वर्ग कसा काय दाखवू शकशील ? त्यांना आपल्या पंखांची टोके सुद्धा दिसू शकत नाहीत. तू इथेच राहा जॉन आणि येथील समुद्रपक्ष्यांना शिकव. यांना तुझे शिकवणे समजेल. जर चांग त्याच्या आधीच्या जगात निघून गेला असता तर तुला कोणी शिकविले असते ?"

सुलिवनचे म्हणणे खरे होते. . *जो समुद्रपक्षी सर्वात दूरचे पाहू शकतो तोच सर्वात उंच उडू शकतो.*

जोनाथनने तिथेच नवीन पक्ष्यांबरोबर काम सुरू केले. ते सर्व हुशार होते व नवीन ज्ञान लगेच ग्रहण करत. पण त्याला वारंवार जुन्या जगाची आठवण येऊ लागली.
"पृथ्वीवर एक दोन समुद्रपक्षी तरी नवीन ज्ञानसंपादनाची लालसा बाळगत असतील. ज्या दिवशी त्याला आपल्या कळपातून बहिष्कृत केलं त्याच दिवशी जर त्याला चांगसारखा प्रशिक्षक लाभला असता तर आज त्याला कितीतरी जास्त ज्ञाान मिळाले असते."

"सुलिवन मी चाललो". जोनाथन एक दिवस म्हणाला. "तुझे शिष्य आता वेगाने प्रगती करीत आहेत. नवीन शिष्य मिळवायला तुला ते मदत करतील".

"मला कळते आहे की पृथ्वीवर असलेल्या समुद्रपक्ष्यांना जर कोणी स्वर्ग दाखवू शकत असेल तर तो एकच आहे **जोनाथन लिव्हिंग्स्टन सीगल.** तुझ्या प्रवासासाठी शुभेच्छा !" सुलिवनने निरोप दिला.

त्यानंतरच्या आयुष्यात जोनाथनने केवळ आपल्या पृथ्वीवरील बांधवांचा विचार केला. आता देहाच्या बंधनातून तो मुक्त होता.

…………………..



फ्लेचर या समुद्रपक्ष्याचे वय अजून लहान होते आणि त्याच्यावर फार अन्याय झाला होता.

“त्यांना काय वाटेल ते म्हणू देत”. त्याने डोंगरावर उडताना विचार केला.. “नुसते पंख फडफडत इकडून तिकडे उडणे हे काय उडणे आहे का ? हे तर चिलटेसुद्धा करतात. मी प्रमुखासमोर हवेत एक कोलांटी काय मारली , मला थव्याच्या बाहेरच काढले. ते काय सगळे आंधळे आहेत का ? त्यांच्या हे लक्षात कसे येत नाही की आपण जर उडायला शिकलो तर समुद्रपक्ष्यांसाठी ती किती अभिमानाची बाब ठरेल.”

“ते काय विचार करतात याची मला अजिबात पर्वा नाही.एक दिवस मी या सर्वांना दाखवून देईन की उडणे काय असते आणि ते सर्वजण स्वतःच्या वागण्याचा पश्चात्ताप करतील”. हा त्याच्या अंतर्मनातून आलेला आवाज ऐकून तो शरमला.

“फ्लेचर इतका रागावू नकोस.तुला थव्यातून काढून टाकून इतरांनी स्वतःचेच नुकसान करून घेतले आहे. सत्य कळल्यावर त्यांना या सगळयाचा पश्चात्ताप होईल. तू त्यांना माफ कर आणि त्यांना सत्य समजावून देण्यासाठी मदत कर”.

फ्लेचरच्या डाव्या बाजूने जगातील सर्वात ज्ञानी समुद्रपक्षी उडत होता. त्याला आपले पंख हलविण्याची गरज पडत नव्हती. तरूण फ्लेचरला काही कळेना. “हे काय घडतंय, मला वेड तर नाही ना लागलं ?”

एक आवाज त्याच्या कानात घुमू लागला. “तुला उडायचंय का” ?

“होय मला उडायचंय”

“फ्लेचर, जर तुला उडणं शिकायचं असेल तर मला वचन दे की तू थव्यातील इतरांना माफ करशील आणि त्यांना ज्ञानाची नवीन शिखरे दाखविण्याचा प्रयत्न करशील.”

फ्लेचरचे वय लहान होते. तो अजाण होता व अहंकारी होता.पण स्वतःच्या मनाच्या आवाजापुढे तो काही बोलू शकला नाही.

“मी उडणे शिकायला तयार आहे. ठीक आहे. आपण आधी अभ्यास चालू करू. तळपत्या समुद्रपक्ष्याने सांगितले”.

जोनाथन दूरवरच्या शिखरांवर गोल चकरा मारू लागला. त्याचा शिष्य उत्साही आणि तरतरीत होता. त्याच्यात शिकण्याची दुर्दम्य इच्छा होती. फ्लेचरने एक दिवस हवेत एक गिरकी करण्याचा प्रयत्न केला पण तो अयशस्वी झाला.



"तू माझ्याबरोबर स्वतःचाही वेळ वाया घालवतो आहेस जोनाथन . मी मूर्ख बेअक्कल आहे . कितीही प्रयत्न केला तरी हे मला जमणार नाही ." फ्लेचर म्हणाला .

जोनाथनने फ्लेचरला तीच करामत करून दाखविली . फ्लेचर बारकाईने जोनाथनला न्याहाळत होता .

तीन महिन्यात जोनाथनला सहा शिष्य मिळाले . ते सर्व बहिष्कृत व शिकण्याची महत्त्वाकांक्षा असलेले होते . त्या सर्वांना उडण्याचे अवघड प्रकार सोपे वाटत होते पण त्यामागचे तंत्र जाणून घेण्यात ते कमी पडत होते .

"आपल्यातील प्रत्येक पक्षी स्वतंत्रतेचे प्रतीक आहे" . जोनाथन सांगत असे .

"संतुलित व नियंत्रित उडण्यातूनच आपण स्वतःचे अस्तित्व सिद्ध करू शकतो . जी गोष्ट आपल्याला अडवू पाहील त्याला दूर सारावयास हवे . यासाठीच आपण एवढया कठीण कसरती शिकत आहोत ."

दिवसभराच्या श्रमानंतर सगळे शिष्य थकून जात . त्यांना नवनवीन गोष्टी आणि वेगवान उडणे शिकण्यात मजा वाटत होती . नवीन शिकण्याची त्यांची भूक वाढत होती . परंतु हे कोणाच्याच लक्षात आले नव्हते की हवा , पंख याप्रमाणेच उडण्याचा विचार हे एक सत्य होते .

"तुमचे एका पंखापासून दुस-या पंखापर्यंतचे शरीर हा एक विचार आहे . विचारांचे बंधन तोडल्यावरच तुम्ही देहाचे बंधन तोडू शकाल" . जोनाथन सांगत असे .

पण त्याचे म्हणणे त्यांच्यापर्यंत पोहोचू शकत नव्हती . एका महिन्यानंतर जोनाथनने परत थव्यात परतण्याचा विषय काढला .

"आम्ही आत्ता परत जायला तयार नाही" . हेन्री नावाच्या समुद्रपक्ष्याने बोलायला सुरूवात केली . "तिकडे आमचे कसे स्वागत होईल ? आम्हाला थव्याबाहेर काढले आहे . आता परत आम्ही कोणत्या तोंडाने तिकडे जाणार ?" .

सर्व विदयार्थी अस्वस्थ दिसत होते . थव्याचा एक नियम होता की बहिष्कार टाकलेल्या पक्ष्याला परत थव्यात घेत नसत . गेल्या दहा हजार वर्षात हा नियम तोडायची कोणीच हिंमत केली नव्हती . नियमाप्रमाणे परत जाणे शक्य नव्हते आणि जोनाथन सांगत होता की थव्यात परत जा . निर्णय घ्यायला अजून वेळ लावला असता तर जोनाथन एकटाच परत गेला असता .

"आपण जर आता थव्यात नाही तर त्याच्या कायदयांचे पालन करण्याची तरी काय गरज आहे" .
फ्लेचर इतरांना म्हणाला . "पण तिकडे जर भांडण वगैरे झाले तर आपण जोनाथनला मदत करू शकू ."

................................ .



मग त्या आठ जणांनी पश्चिमेकडे उड्डाण केले. सगळयांचे पंख एकमेकांना जवळजवळ स्पर्श करत होते. जोनाथन सर्वात पुढे होता. फ्लेचर उजवीकडे तर केल्विन डावीकडे होता. एकशे पस्तीस मैल या वेगाने त्यांचा थवा त्यांच्या काफिल्यावरून उडत होता. काफिल्यातील पक्षी एकदम स्तब्ध झाले. आठ हजार समुद्रपक्षी या अद्‌भुत दृश्याकडे डोळे विस्फारून पाहात राहिले. आठही जणांनी हवेत एक गिरकी घेतली आणि पंखांची अजिबात फडफड न करता विनासायास ते वाळूवर उतरले. त्यांचा हा थवा अशा प्रकारे हवेत गिरकी घेणे ही नित्याची बाब असल्याप्रमाणे खाली उतरला होता.

काफिल्यात नवीन पक्षी आल्याची गोष्ट अल्पावधीत षट्‌कर्णी झाली. या पक्ष्यांना तर आपण काफिल्याबाहेर काढले होते मग ते परत कसे आले ?. काफिल्यातील पक्ष्यांना तर काही उमजतच नव्हते. कदाचित यामुळेच भांडण होण्याची वेळ आली नाही.

“हे ठीक आहे की या सर्वांना आपण हद्दपार केले होते पण त्यांना इतके विलक्षण उडणे कोणी शिकविले ?”. काफिल्याच्या प्रमुखाने आज्ञा केली की या नवीन आलेल्या पक्ष्यांशी कोणीही बोलायचे नाही. जो कोणी त्यांच्याशी बोलेल त्यालाही काफिल्यातून हद्दपार केले जाईल. त्यांची देखभाल करणा-याला देखील हाच नियम लागू होईल.

सगळयांनी जोनाथनकडे पाठ फिरवली. परंतु विचलित न होता त्याने आपल्या विदयार्थ्यांबरोबर उड्डाणाचे धडे चालू ठेवले. तो त्यांनी तरबेज होण्यासाठी सतत प्रोत्साहन देत असे.

“मार्टिन” तो एका विदयार्थ्यावर ओरडला “तू म्हणतोस की तुला संथ उड्डाण चांगले जमते पण ते तू माझ्यासमोर करून दाखव. नाहीतर तुझे कौशल्य पक्के होणार नाही. म्हणून परत एकदा उडून दाखव”.

मार्टिनला आश्चर्य वाटले. संथ उड्डाणाच्या करामती सर्वासमोर करून दाखविताना त्यालाच स्वतःच्या क्षमतेबद्दल आभिमान वाटला. हवा अगदी शांत असताना देखील बाहेरील पंखांची फडफड न करता वाळूवरून उंच आकाशात सहजपणे उडून तो परत खाली येऊ शकत होता. याचप्रकारे चार्ल्स रोलॅंड नावाच्या समुद्रपक्ष्याने पर्वतरांगांमध्ये चोवीस हजार फूट उंच उडण्याचे धाडस केले व तो दिमाखात परतला. दुस-या दिवशी अजून उंच उडण्याचा त्याने निश्चय केला. नंतर फ्लेचरने हवेत विलक्षण करामती केल्या. त्याचे पांढरेशुभ्र पंख सूर्यकिरणांमुळे चमकत होते. डोळे दिपत असूनसुद्धा खालचे अनेक पक्षी त्याला न्याहाळत होते.

जोनाथन आपल्या विदयार्थ्यांबरोबरच असायचा. तो त्यांना नवीन करामती शिकवायचा, त्यातील तांत्रिक गोष्टींचे बारकावे समजावून दयायचा, सल्ले दयायचा आणि त्यांच्यावर शिकण्यासाठी दबाव आणून त्यांना प्रोत्साहन दयायचा. तो विदयार्थ्यांसमवेत काळोख्या रात्रीसुद्धा उड्डाणांचा अभ्यास करत असे. काफिल्यातील बाकीचे पक्षी एक दुस-यांना खेटून त्यांना बघत राहात.

अभ्यास संपल्यावर सर्व विदयार्थी वाळूवर पहुडत व जोनाथनचे म्हणणे शांतपणे ऐकत. त्यातील काही गोष्टी त्यांच्या डोक्यावरून जात तर काहींचे नीट आकलन होत असे.



रात्रीच्या वेळी या विदयार्थ्यांजवळ काफिल्यातील काही पक्षी उत्सुकतेने येऊन बसत. ते सर्व गोष्टी लक्षपूर्वक ऐकत. अंधारामुळे काफिल्यातील इतर सदस्य त्यांना पाहू शकत नव्हते. सकाळ होण्याआधी ते काफिल्यात परत जात.

एक महिन्यानंतर कळपातील एक पक्षी बाहेर आला व त्याने उड्डाण शिकण्याची इच्छा व्यक्त केली. या कृतीमुळे टेरिन्सला देखील बहिष्कृत व्हावे लागले. तो जोनाथनचा आठवा शिष्य झाला. पुढच्याच रात्री किर्क मेनार्ड नावाच्या अजून एक समुद्रपक्ष्याने लडखडत वाळूवरून चालत येत जोनाथनचे पाय धरले.

"मला मदत कर. त्याने विनवणी केली. मला आयुष्यात उडणे सर्वात प्रिय आहे."

"आत्ता चल". जोनाथन म्हणाला. "आत्ता जमिनीवरून उठ. आपण लगेच शिकणे चालू करू."

"तुला कळत नाहीये. . मला माझे पंख हलविता देखील येत नाहीत".

"मेनार्ड . . आता तू जीवन जगण्यासाठी मुक्त आहेस. तुला तुझे अस्तित्व टिकविण्याची धडपड आता करता येईल. काहीही तुला अडवू शकणार नाही. पक्ष्यांसाठी हाच खरा आणि शाश्वत नियम आहे".

"तुला वाटते आहे की मी उडू शकेन."

"मी एवढेच सांगतो आहे की आता तू स्वतंत्र आहेस."

किर्क मेनार्डने पंख फैलावून सहजपणे आकाशात झेप घेतली. पाचशे फूट ऊंचीवर तो आनंदाने ओरडला. . "मी उडू शकतो. मी उडू शकतो". त्याच्या आवाजाने काफिल्यातील इतर पक्षी जागे झाले.

सकाळी विदयार्थ्यांच्या निवासस्थानाबाहेर हजारो समुद्रपक्ष्यांची रीघ लागली होती. सर्वजण उत्सुकतेने मेनार्डकडे पाहात होते. आपल्याला कोणी पाहात असेल असल्या गोष्टींची आता त्यांना पर्वा नव्हती. ते सर्व जोनाथनचे म्हणणे ऐकून समजावून घेण्याचा प्रयत्न करत होते.

जोनाथनचे विचार साधे होते. "उडणे प्रत्येक समुद्रपक्ष्याचा जन्मसिद्ध अधिकार आहे. बंधनातून मुक्त होणे हे प्रत्येक समुद्रपक्ष्याचे निश्चित भवितव्य आहे . स्वतंत्र होण्यात येणारे सर्व अडथळे पार करा. मग ती परंपरा असेल , अंधश्रद्धा असेल किंवा अजून कोणतीही अडचण असेल."

"किंवा तो काफिल्याचा नियम असेल" गर्दीतून एक आवाज आला.
"स्वतंत्रतेकडे नेणाराच नियम खरा असतो". जोनाथन सांगत होता."



“आम्ही तुझ्यासारखे कधी उडू शकू. तू तर विशेष आहेस.कुशल आहेस. आणि साक्षात परमेश्वराचे रूप आहेस. आमच्या सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहेस.”

“फ्लेचर, रोलॅंड, लोवेल यांच्याकडे पाहा. तेसुद्धा परमेश्वराचे रूप आहेत का ? हे सर्व आपल्यासारखेच तुमच्या माझ्यासारखेच आहेत. तुम्ही आणि ते यांच्यात फक्त एकच फरक आहे. त्यांना आपल्या ‘स्व’ची खरी ओळख पटली आहे. आणि त्यांनी ज्ञानाच्या दिशेने प्रवास सुरू केला आहे.”

रोज गर्दी वाढू लागली.काहीजण प्रश्न विचारत, काही पूजा करत, तर काहीजण द्वेषाने पाहात. काहीजण म्हणत, जोनाथन एक महान आत्मा आहे. काहीजण म्हणत , तो काळाच्या हजारो वर्षे पुढे आहे. विचारपूर्वक जोनाथन म्हणायचा “या प्रकारची उड्डाणे नेहमीच होत आली आहेत. थोडया प्रयत्नानंतर कोणीही ती आत्मसात करू शकेल. याचा स्थळकाळाशी काय संबंध ?”

........................

आठवडयानंतर एक घटना घडली. फ्लेचर एका विदयार्थ्याला वेगाने उडण्याचे प्रात्यक्षिक दाखवत होता. त्याने सात हजार फूट उंचीवरून सुरकांडी मारली. तो वाळूला पाय टेकविणार इतक्यात एक तरूण पक्षी त्याच्या वाटेत आला.त्यापासून स्वतःला वाचविण्यासाठी फ्लेचर घाईघाईत डावीकडे वळला आणि ताशी दोनशे मैल या वेगाने एका पहाडावर जाऊन आदळला.

त्याला वाटले की तो अभेदय पहाड एका नवीन जगाचा दरवाजा आहे.आदळताना तो घाबरला होता पण आता तो एका नवीन अंतराळात तरंगत होता.त्याला जोनाथनचे शब्द आठविले.

“आपण हळूहळू आपल्या मर्यादांवर विजय मिळवू. थोडया सरावानंतर आपण पहाडातून उडणे सुद्धा शिकू.”

“जोनाथन , तू इकडे कसा ? तो पहाड, ते आदळणे, मी मृत झालो नाही का” ?

“फ्लेचर विचार कर. जर तू माझ्याशी बोलतो आहेस तर तू मेलेला नाहीस. तू पहाडावर आदळताना आपल्या जाणिवेचा स्तर पटकन बदललास. आता तू या उंचीवर पोहोचून पुढे शिकू शकतोस.किंवा तुला वाटले तर तू परत काफिल्यात जाऊन सुद्धा शिकवू शकतोस”. जोनाथन म्हणाला.

“मला परत जायचे आहे. मी आत्ताच काही नवीन विदयार्थ्यांना शिकवायला सुरूवात केली आहे.”
“जशी तुझी मर्जी फ्लेचर. आता आपले शरीर म्हणजे फक्त एक विचारशक्ती आहे.”
फ्लेचरने संमतीदर्शक मान डोलावली. आपले पंख सरळ केले आणि पहाडाखाली आपले डोळे उघडले. फ्लेचरला तसे जाताना पाहून सर्व समुद्रपक्षी तिथे गोळा झाले होते.

“बघा तो परत जिवंत झाला. तो मेला होता आणि आता चालतो आहे.”



“महान आत्म्याच्या पुत्राने त्याला स्पर्श करून जीवनदान दिले आहे”.
“नाही तो ही गोष्ट नाकारतो आहे .तो सैतान आहे. सैतान आपले वाटोळे करण्यासाठी आला आहे”.

आता चार हजार समुद्रपक्षी जमा झाले होते. “सैतान सैतान” अशा घोषणा चारी बाजूंनी कानावर पडत होत्या.

“आपण येथून निघून गेलो तर तुला बरे वाटेल का फ्लेचर ? ”. जोनाथनने विचारले.

“होय.बरे वाटेल”.फ्लेचरने उत्तर दिले.

त्या क्षणी ते गर्दीपासून साधारण अर्ध्या मैलावर होते. गर्दीतील पक्ष्यांच्या टोकदार चोचींनी जेव्हा त्यांना टोचण्याचा प्रयत्न केला तेव्हा तिथे फक्त विरळ हवा होती.

“असं का ?” जोनाथन विचार करत होता. “पक्ष्यांना हे समजावणे की ते मुक्त आहेत. स्वतंत्र आहेत आणि थोडया सरावानंतर उडायला शिकू शकतील. हे काम इतके अवघड का आहे ? ”

सकाळपर्यंत गर्दी आपला कालचा रानटीपणा विसरली होती. पण फ्लेचर ती घटना विसरू शकत नव्हता. “जोनाथन , तू काफिल्यातील पक्ष्यांना प्रेम करायला , स्वप्ने पाहायला शिकवलेस. पण ज्यांनी तुझा जीव घ्यायचा प्रयत्न केला त्या पक्ष्यांवर तू प्रेम कसे करू शकतोस ? ”

“फ्लेचर , तुला अभ्यास करताना प्रत्येक समुद्रपक्ष्याचे फक्त गुण पाहायला हवेत आणि ते आत्मसात करायचा प्रयत्न करायला हवा.प्रेमाचा हाच अर्थ मला अभिप्रेत होता. तुला एकदा हे शिकता आलं की खूप समाधान वाटेल.”

“मला एका पक्ष्याची आठवण येते. त्याचे नाव होते फ्लेचर.त्याला काफिल्याने बहिष्कृत केले होते. त्याने त्या नरकात संघर्ष करून स्वतःभोवती एक स्वर्ग बनविला. आता तो संपूर्ण काफिल्याला मार्गदर्शन करतो आहे.”
फ्लेचरला काहीच समजेना. त्याने भयभीत मुद्रेने जोनाथनला विचारले “ मी ? काफिल्याचा प्रमुख ? कसे शक्य आहे ? तू येथील गुरू आहेस. तू आम्हाला सोडून जाऊ शकत नाहीस.”

“का जाऊ शकत नाही ? असे कितीतरी काफिले असतील , कितीतरी फ्लेचर असतील ज्यांना या फ्लेचरपेक्षा कित्येक जास्त पटींनी मार्गदर्शकाची गरज असेल. ज्यांना उजेडाची प्रतीक्षा आणि गरज असेल.”

“मी ? जोनाथन , मी एक सामान्य समुद्रपक्षी आहे आणि तू एक.........”

“मी एक महान समुद्रपक्ष्याचा पुत्र आहे”. जोनाथन फ्लेचरचे म्हणणे मध्येच थांबविले. “आता तुला माझी अजिबात गरज नाही. तुला आता फक्त स्वतःला ओळखायचे आहे. आपल्या आतील अमर्याद ‘फ्लेचर’ या समुद्रपक्ष्याला नीट ओळखायचे आहे. तोच आता तुझा खरा गुरू आहे. तू हे समजावून घे आणि चिंतन कर.”



क्षणार्धात जोनाथनचे शरीर हवेत हेलकावले आणि तो एकदम पारदर्शक बनला. "माझ्या बाबतीत अफवा पसरवू नकोस आणि मला परमेश्वर बनवू नकोस. मी केवळ एक समुद्रपक्षी आहे आणि मला उड्डाण प्रिय आहे."

"जे तू स्वतःच्या डोळयांनी बघतो आहेस त्यावर विश्वास ठेवू नकोस फ्लेचर. डोळे केवळ एका मर्यादेपर्यंतचेच दाखवितात. तू हे समजून घे. जे तुला दिसेल त्याचा शोध घे. तुला आपोआप रस्ता दिसेल."

शरीराचे हेलकावे आता थांबले. जोनाथन शून्यात विलीन झाला.

काही वेळाने फ्लेचर अवकाशात झेपावला. त्याला विदयार्थ्यांचा एक नवीनच जथा दिसला. ते सर्व शिकण्यात तत्पर होते.

"तुम्हाला सर्वात प्रथम हे लक्षात घ्यायला हवे" . . त्याने आपल्या भारदस्त आवाजात सांगायला सुरूवात केली.
"की प्रत्येक समुद्रपक्षी अमर्याद स्वतंत्रता व मुक्तिचे प्रतीक आहे. प्रत्येक समुद्रपक्षी त्या महान आत्म्याचाच एक हिस्सा आहे. तुमचे सर्व शरीर एका पंखापासून दुसऱ्या पंखापर्यंत केवळ एक विचार यापलीकडे काही नाही."

तरूण विदयार्थ्यांना आपल्या शिक्षकाचे म्हणणे कळत नव्हते.

"चला आता पहिला धडा सुरू करू". फ्लेचर म्हणाला. हे म्हणत असताना फ्लेचरला त्याच्या मित्राच्या इमानदारपणाचा साक्षात्कार झाला. त्याच्या स्वतःमध्येदेखील त्या महान आत्म्याचे अवशेष होते.

" आता कोणतीच मर्यादा , कोणतेच बंध नाहीत जोनाथन" ...तो विचार करू लागला. "मी शून्यातून प्रगट होऊन तुला उडण्याविषयी एक दोन नवीन गोष्टी सांगेन. ती वेळ आता फार दूर नाही."

फ्लेचरने मंदस्मित केले. तो विदयार्थ्यांसमवेत एका विलक्षण समाधानाचा अनुभव घेत होता.

समाप्त

.........................................